सरस्वती मंदिराजवळील बारव-येरगी, ता.देगलूर, जि.नांदेड या स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या ब-१ निविदेस मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२४/प्र.क्र.४६/सां.का.३**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ फेब्रुवारी २०२५.

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. स्मारक-२०२४/ प्र.क्र.४६/सां.का.३, दिनांक ०१.०३.२०२४
२) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय मुंबई यांचे पत्र क्र.स्मारके/ २०२४/२४११, दिनांक ०५.०८.२०२४

**प्रस्तावना :-**

"नमो-११ सुत्री कार्यक्रम-नमो तीर्थस्थळ सुधार अभियान-७३" या योजनेंतर्गत सरस्वती मंदिराजवळील बारव, येरगी, ता.देगलूर, जि.नांदेड या स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामासाठी रु.२,२८,०४,९८८/- इतक्या रकमेस उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार निविदा प्रक्रिया पूर्ण करून संचालनालयाने उपर्निर्दिष्ट क्र. २ येथील पत्रान्वये निविदेस मंजूरी देण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. या निविदेस मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सरस्वती मंदिराजवळील बारव, येरगी, ता.देगलूर, जि.नांदेड या स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामासाठी मे.गायत्री कन्स्ट्रक्शन, छ.संभाजीनगर यांच्या निविदा दराइतक्याच (At Par) न्यूनतम निविदेस (ब-१) या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| **निविदाकाराचे नाव** | मे.गायत्री कन्स्ट्रक्शन, छ.संभाजीनगर |
| **अंदाजपत्रकीय रक्कम रुपये** | रु. २,२८,०४,९८८-/ |
| **संचालनालयाचा अंदाजित प्रकल्प खर्च** | रु. १,६८,०७,४६७-/ |
| **निविदाकाराचा अंदाजित प्रकल्प खर्च** | रु. १,६८,०७,४६७/-(At Par) |
| **अभिप्राय** | मे.गायत्री कन्स्ट्रक्शन, छ.संभाजीनगर यांची निविदा दराइतक्याच (At Par) निविदा आहे. सदर निविदा प्रथम क्रमांकाची (L-१) निविदा आहे. |

०२. या प्रयोजनार्थ येणारा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. झेडडी-२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृती (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम) (२२०५ १३०२) २७-लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण होईल हे पाहण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची असेल.

०४. हा शासन निर्णय विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७ (२) "अ" नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थसंकल्प-३, दिनांक २५ जुलै, २०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०२१७१६२१४६७२२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a18662 0ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C5326 84054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.02.17 16:23:08 +05'30'

**(नंदा राऊत)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. अपर मुख्य सचिव, (सांस्कृतिक कार्य) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सां.का.३) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई

८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२.निवड नस्ती, सां.का.३